# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः वैमंप्र-२०२१/प्र.क्र.२३२/आरोग्य-६

गो.ते. रुग्णालय आवार संकुल इमारत,
१० मजला, नवीन मंत्रालय, मुंबई-०१
तारीख: २५ नोव्हेंबर, २०२१.

वाचा -

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. वैमप्र-२०१३/प्र.क्र.१०१/आरोग्य-६, दिनांक २८ फेब्रुवारी, २०१३.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. वैमप्र-२०१५/प्र.क्र.३६३/आरोग्य-६, दिनांक २० ऑक्टोंबर, २०१५.
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. वैमप्र-२०१८/प्र.क्र.२७३/आरोग्य-६, दिनांक ०९ जानेवारी, २०१९.
४) आरोग्य सेवा संचालनालयाचे पत्र क्र. आआसे/राज्यस्तर कक्ष-३/टे-५/जळगाव वै.मंडळ स्थापना/जा.क्र. १०५६७-६८/२१, दिनांक २३.०६.२०२१.

**प्रस्तावना** -

महाराष्ट्र नागरी सेवा नियमामधील तरतूदीच्या अनुषंगाने राज्यसेवेमध्ये दाखल होणाऱ्या उमेदवारांना नेमणूकीसाठी त्यांची निवड झाल्यानंतर वैद्यकीय तपासणीसाठी वैद्यकीय मंडळाकडे पाठविण्यात येते. अशा उमेदवारांच्या वैद्यकीय तपासणीसाठी राज्यामध्ये संदर्भाधिन क्र. ३ येथील दिनांक ०९.०१.२०१९ च्या शासन निर्णयान्वये १६ वैद्यकीय मंडळे स्थापन्न करण्यात आली आहेत. वैद्यकीय महाविद्यालयांमध्ये कार्यरत असलेल्या वैद्यकीय मंडळाच्या धर्तीवर जळगाव जिल्ह्याकरीता वैद्यकीय तपासणी करण्यासाठी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रूग्णालय, जळगाव येथे वैद्यकीय मंडळ स्थापन करण्याबाबत सहसंचालक, आरोग्य सेवा,रूग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांच्याकडून प्राप्त प्रस्तावानुसार संदर्भाधिन क्र. ३ येथील दिनांक ०९.०१.२०१९ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या १६ वैद्यकीय मंडळांतर्गत अ.क्र.१० येथे नमूद जळगाव जिल्ह्यासाठी स्वतंत्र वैद्यकीय मंडळ स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय**-

महाराष्ट्र नागरी सेवा नियमामधील तरतूदीच्या अनुषंगाने राज्यसेवेत दाखल होणाऱ्या उमेदवारांना नियुक्ती करीता त्यांची निवड झाल्यानंतर वैद्यकीय तपासणी करण्याकरीता राज्यामध्ये वैद्यकीय मंडळे स्थापन करण्यात आलेली आहेत. त्या व्यतिरिक्त शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व

रूग्णालय, जळगाव येथील शासकीय महाविद्यालयांशी संलग्न असलेल्या रूग्णालयांमध्ये वैद्यकीय मंडळांची स्थापना करण्यात येत आहे. सदर वैद्यकीय मंडळाची रचना खालीलप्रमाणे असेल.

१) प्राध्यापक, वैद्यकशास्त्र

२) प्राध्यापक,शल्यचिकीत्सा

३) प्राध्यापक, नेत्रचिकीत्सा

२. महिला उमेदवारांच्या वैद्यकीय तपासणीसाठी मंडळामधील वरील सदस्यांमध्ये महिला वैद्यकीय अधिकारी नसल्यास, महिला वैद्यकीय अधिकारी, गट-अ (वर्ग-१) अतिरिक्त सदस्य असतील. वरील सदस्यांपैकी जेष्ठ वैद्यकीय अधिकारी त्या वैद्यकीय मंडळाचे अध्यक्ष असतील.

जळगाव या ठिकाणी नवीन वैद्यकीय मंडळ स्थापन केल्यामुळे सर्वच वैद्यकीय मंडळांच्या अखत्यारीतील जिल्हे खालीलप्रमाणे असतील.

| अ.क्र. | वैद्यकीय मंडळे | जिल्हे |
|---|---|---|
| १ | ग्रॅन्ट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व जे. जे. समुह रुग्णालय, भायखळा, मुंबई | ठाणे,पालघर,रायगड, नाशिक |
| २ | गोकुळदास तेजपाल रुग्णालय, मुंबई | मुंबई शहर व मुंबई उपनगर |
| ३ | बै.जी.शासकीय महाविद्यालय व ससुन सर्वोपचार रूग्णालय, पुणे | पुणे, अहमदनगर |
| ४ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, व रुग्णालय, नागपुर | नागपुर, भंडारा, गोंदिया |
| ५ | इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपुर | वर्धा |
| ६ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, औरंगाबाद | औरंगाबाद, जालना |
| ७ | स्वामी रामानंद तीर्थ वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, अंबाजोगाई, जि. बीड | बीड |
| ८ | डॉ. वैशंपायन स्मृती शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, सोलापुर | सोलापुर व उस्मानाबाद |
| ९ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय मिरज व पद्मभूषण वसंतदादा पाटील शासकीय रुग्णालय, सांगली | सांगली, सातारा |
| १० | श्री. भाऊसाहेब हिरे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, धुळे | धुळे, नंदुरबार |
| ११ | डॉ. शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नांदेड | नांदेड, परभणी, हिंगोली |
| १२ | श्री. वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, यवतमाळ | अमरावती, यवतमाळ |
| १३ | राजर्षी छत्रपती शाहू महाराज शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व छत्रपती प्रमिलाराजे सर्वोपचार रुग्णालय, कोल्हापुर | कोल्हापुर, सिंधुदूर्ग, रत्नागिरी |

| | | |
|---|---|---|
| १४ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, लातुर | लातूर |
| १५ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, अकोला | अकोला, बुलढाणा, वाशिम |
| १६ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, चंद्रपुर | चंद्रपुर, गडचिरोली |
| १७ | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रूग्णालय, जळगाव | जळगाव |

३. महाराष्ट्र नागरी सेवा नियमातील तरतुदीनुसार गट-क व गट-ड संवर्गातील कर्मचाऱ्यांची वैद्यकीय तपासणी करण्याचे अधिकार जिल्हा शल्यचिकित्सकांना आहेत. त्यानुसार त्यांच्याकडून अशी प्रमाणपत्रे सुट्टीचा दिवस वगळता दररोज दिली जाणे अपेक्षित आहे.काही विशिष्ट प्रकरणांमध्ये आवश्यकता भासल्यास, सदर उमेदवारास संबंधित वैद्यकीय मंडळाकडे संदर्भीत करण्यात यावे. वरील वैद्यकीय मंडळांची बैठक प्रत्येक सोमवारी आयोजित करण्यात यावी.

४. वैद्यकीय मंडळामध्ये बदल करावयाचा झाल्यास, आयुक्त, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई शासनास स्वतंत्र प्रस्ताव सादर करतील. महाराष्ट्र वैद्यकीय संहिता भाग-१ (महाराष्ट्र सिव्हील मेडिकल कोड) मधील प्रकरण १९ मध्ये विहीत करण्यात आलेले नियम व मार्गदर्शक तत्वे यानुसार सर्व वैद्यकीय मंडळांची कार्यपध्दती राहील व त्यांचे अधिकार क्षेत्र त्यांच्या अखत्यारीतील जिल्हयांसाठी मर्यादित राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२१११२५१११०४३४३११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Dattaram Mahadeshwar

Digitally signed by Sanjay Dattaram Mahadeshwar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759d43d3ca03f08520a6d49169531e74206cd390898bbe0690fead8f00f6a3eb, pseudonym=80E93D8EE476E7190080D9A7194A8F4C4198CFFD, serialNumber=09A8917EDE715503310B61D8A24357A945B188F3A254ABA25AC8365BB66E4EE8, cn=Sanjay Dattaram Mahadeshwar
Date: 2021.11.25 15:01:47 +05'30'

**(संजय महाडेश्वर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुंटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. राज्यमंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुंटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

६) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,सर्व मंत्रालयीन विभाग,मंत्रालय,मुंबई
७) विभागीय आयुक्त (सर्व)
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) व (लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर
९) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, नवीन मंत्रालय, मुंबई
१०) सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (*पत्राद्वारे)
११) सचिव,वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, नवीन मंत्रालय,मुंबई
१२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
१३) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
१४) सर्व महानगरपालिका आयुक्त
१५) जिल्हाधिकारी (सर्व)
१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१७) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
१८) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
१९) सहसंचालक, आरोग्य सेवा (रूग्णालये/राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई
२०) सहसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
२१) उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळे (सर्व)
२२) जिल्हा शल्यचिकित्सक (सर्व)
२३) जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
२४) अधिष्ठाता,शासकीय वैद्यकीय महाविद्यालये (सर्व) (संचालक,वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांचे मार्फत)
२५) संबधित वैद्यकीय मंडळे (सर्व), (संचालक,वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांचे मार्फत)
२६) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय,मुंबई (सर्व कार्यासने)
२७) अवर सचिव (वैसेवा-१),वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,मंत्रालय,मुंबई
२८) निवड नस्ती (आरोग्य -६)